

जन वाचन आंदोलन

ग्रंथ आमुचे साथी, ग्रंथ आमुच्या हाती
ग्रंथ उजळती अज्ञानाच्या अंधाराच्या राती
या ग्रंथाच्या तेजामधुनी जन्मा येते क्रांती
ग्रंथ शिकवती माणुसकी अन् ग्रंथ शिकवती शांती
निराश जीवा धीर देउनी पुढे घेऊनी जाती
ग्रंथ आमुचे साथी, ग्रंथ आमुच्या हाती
ग्रंथ उजळती अज्ञानाच्या अंधाराच्या राती

पुस्तकातल्या सुंदर गोष्टी, सुंदर सुंदर गाणी
पुस्तकातुनी बालकवींची भेटतसे फुलराणी
तारे, वारे, झरे, पाखरे यांचे हे सांगाती
ग्रंथ आमुचे साथी, ग्रंथ आमुच्या हाती
ग्रंथ उजळती अज्ञानाच्या अंधाराच्या राती

वाचन आहे प्रवास सुंदर, नव्या नव्या ज्ञानाचा
इतिहासाचा, साहित्याचा आणिक विज्ञानाचा
नव्या जगाचे नव्या युगाचे प्रकाश गाणे गाती
ग्रंथ आमुचे साथी, ग्रंथ आमुच्या हाती
ग्रंथ उजळती अज्ञानाच्या अंधाराच्या राती

मंगेश पाडगावकर

---

भारत ज्ञान विज्ञान समुदाय
मूल्य तीन रूपये

# आपली आशा

रूपांतर : विनया देशपांडे



भारत ज्ञान विज्ञान समुदाय

पुस्तकाचे नाव : आपली आशा

मराठी रूपांतर : विनया देशपांडे

निर्मिती सहाय्य : दिनानाथ मनोहर

जवाआं/म : तीन (दुसरी आवृत्ती)

प्रकाशन : सप्टेंबर १९९९

(हे पुस्तक तामिळनाडूच्या कामराजर जिल्ह्यातील साक्षरता चळवळीच्या कार्यकर्त्यांनी तयार केले आहे.)

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समितीतर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित

मूल्य : ३ रूपये



प्रकाशन : दत्ता देसाई
राज्य सचिव, भारत ज्ञान विज्ञान समुदाय (महाराष्ट्र)
अक्षय,२१६,केळकर रस्ता,नारायण पेठ,पुणे-४११०३०.
फोन : ०२०-४४५६६९४
मुद्रण स्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय,पुणे-४११००४.

अक्षर जुळणी / मांडणी : गणेश कांबळे

# आपली आशा

आशा एका गरीब घरात जन्मली. तिच्या जन्मानंतर तिचा बाप गावातून पळून गेला. कुठे गेला काय माहीत? तिच्या आईने तिचा सांभाळ केला. परंतु आशा नेहमी घाबरी घुबरी होत असे. भित्री भागूबाई बनून राहत असे. लहानशा गोष्टीनेही ती घाबरून जात असे.



तिच्यात हिम्मत नाही. तिच्या मनात भीती बसली आहे. तिच्या मनातली भीती दूर करावी लागेल. तिला धाडसी बनवावं लागेल. तुम्ही करणार आशाला मदत?

की तिला तशीच सोडणार वाऱ्यावर? की तिला सांगणार, 'तुझं नशीब वाईट आहे, तुला मदत करून उपयोग नाही'.

तिला अशीच सोडणार नाही ना? ती आपल्या गावची लेक आहे. आपली लेक आहे. आपली बहीण आहे ती. आपली भाची आहे. आपली नात आहे. आशा वाढते आहे, मोठी होत आहे.

## सात वर्षाची आशा



आशा गरीब आहे. पण तिला शिकायचं आहे. ती शाळेला जाते. पहिलीत ती पास झाली. आता ती



दुसरीत गेली आहे.

एक दिवस तिच्या वर्गातील मुलीची पेन्सिल कोणीतरी चोरली. आशा सर्वात गरीब आहे. बाईना तिचाच संशय आला. तिला मार बसला. तिने मार खाल्ला. परंतु ती चूप बसली. पेन्सिल कोणी चोरली, ते तिला माहिती आहे. तिनं एका मुलीला पेन्सिल चोरताना पहिलंदेखील आहे. पण ते सांगायला ती घाबरत आहे. त्या मुलीचं नाव आशा सांगत नाही. आशा मार खाते, रडते. परंतु तिच्या चेहऱ्या- वरचे भाव कोणीच समजून घेत नाही. तुम्ही तरी घेणार का? तिनं काय केलं पाहिजे, हे तिला तुम्ही सांगणार का? तिनं कसं वागायला हवं? तुम्ही तिला काय सल्ला द्याल? जरा विचार करा. विचारपूर्वक सांगा. बघा ती रडते आहे. रडतच बसली आहे.



## नऊ वर्षांची आशा

आशा आपल्या मैत्रिणींबरोबर खेळत होती. खेळता-खेळता एका मुलीशी तिचं भांडण झालं. त्या मुलीची आई आली. तिने आपल्या मुलीची बाजू घेतली. आशाला नको ते बोलली. आशाच्या आईबद्दलही वाईट-वाईट बोलली. ती म्हणते की आईच्या अशा वागण्यामुळेच तुझा बाप पळून गेला.

आशाला या गोष्टीचं वाईट वाटतं. तिला आपल्या मैत्रिणीच्या आईचा रागदेखील येतो. तिला उलट ऐकवावंसं वाटतं. तिला खरं-खोटं करायची इच्छा आहे. परंतु तसं ती सांगू शकत नाही. तिला रडू आवरत नाही.



तुम्हाला काय वाटत? आशा गप्प बसली ते ठीक केलं का? तिनं उत्तर द्यायला हवं होतं? उत्तर द्यायचं, तर काय द्यावं? तिनं काय म्हणायला हवं? विचार करा. सर्वजण विचार करा. तुम्ही आशाला मदत करायची आहे. तुम्हाला, हो तुम्हालाच, ती करावी लागेल. तिला सांगा की तिनं



काय उत्तर द्यावं? या परिस्थितीचा सामना कसा करावा?

## तेरा वर्षांची आशा

आशा आता मोठी झाली आहे. तिनं लिहिणं-वाचणं सोडून दिलं. तिची शाळा बंद झाली. आता ती काड्यापेटीच्या कारखान्यात कामाला जाते. कारखाना गावापासून दूर आहे. ती रोज बसने ये-जा करते.

आशा साधी-भोळी आहे. कुणाशी बोलत नाही. खाली मान घालून येते आणि जाते. बस ड्रायव्हर आशाला अगदी बावळट समजतो. तो आशाची टिंगल करतो. त्याला माहिती आहे तिचं कोणी नाही. वडील नाहीत. आई भांडू शकत नाही. तिला कुणाचा आधार नाही.

आशा काहीच बोलत नाही. आशाला राग येत नाही असं नाही. तिला वाटतं, ड्रायव्हरला लाथ मारावी, त्याला खूप शिव्या द्याव्यात.

काय बोलावं बरं तिनं? तिनं काय केलं म्हणजे ड्रायव्हरची परत असं वागण्याची हिम्मत होणार नाही? सांगा ना! तिला सांगणं हे तुमचं काम आहे. आपल्या गावची लेक आहे ती. तुमच्या मुलीच्या बरोबरीची आहे. तुमच्या बहिणी सारखी आहे. तुमच्या भाची-पुतणीसारखी

आहे. तिला योग्य सल्ला देणार ना? तिला बोलायला शिकवा. ती गप्प बसली तर न जाणो काय - काय सहन करायला लागेल. रोज रोज, सकाळ-संध्याकाळ, दिवस-रात्र, घरी-दारी, तिला काय काय भोगावं लागेल?

## पंधरा वर्षांची आशा

आज शनिवार. संपूर्ण आठवड्याची मजुरी तिला मिळाली. सगळे पैसे तिने जेवणाच्या डब्यात ठेवलेत. ती निर्मनुष्य रस्त्यावरून चालली आहे. रस्त्याच्या कडेला एक गुंड उभा आहे. आशाच्या जेवणाच्या डब्यात पैसे आहेत, हे त्याला ठाऊक आहे. तो डबा हिसकावून पळून जातो.

आशाला काहीच समजेनासं होतं. तिचे हात-पाय गार पडतात. काय करावं आशानं? आपले पैसे ती कसे परत मिळवणार? संपूर्ण आठवडाभर राबून तिने हे पैसे मिळवले होते. तुम्ही तिला काही मदत करू शकता का? कोणता मार्ग दाखवणार तिला? गुंड तिला लुटत असताना तुम्ही गप्प राहणार? चुपचाप आपल्याच मार्गानं निघून जाणार? तिला एकटीला रडत ठेवून असंच तुम्ही घरी निघून जाणार? काय करणार तुम्ही? जरा विचार करा. आशाची देखील काळजी तुम्हीच घ्यायची आहे. तिची गुंडाकडून लूट होणं पटतं तुम्हाला?



## सोळा वर्षांची आशा

कारखान्यात आशाच्या बरोबर शंकर पण का करतो.



शंकरला थोडंफार लिहिता वाचता येतं. शंकर चांगला माणूस आहे. मनाने निर्मळ. कधी कपटीपणाने वागत नाही.

आशाला शंकरचं हे वागणं आवडतं. आशाला शंकर पसंत आहे. आशा त्याच्यावर मनापासून प्रेम करते. शंकरला देखील आशा आवडते.

परंतु शंकरला दुसऱ्या कारखान्यात चांगली नोकरी मिळते. तो आशाला ही गोष्ट सांगतो. आशा त्याला विचारते की तो परत कधी येणार? तो म्हणतो, काय माहीत? जेव्हा सुट्टी मिळेल, तेव्हा येईन. आशाच्या डोळ्यात पाणी येतं. पण ती आपलं प्रेम शब्दात सांगू शकत नाही.



शंकरला तिनं काय सांगायला पाहिजे होतं? कशाप्रकारे आपल्या भावना तिनं व्यक्त करायला हव्या होत्या? स्पष्टपणे आपल्या मनातली गोष्ट तिनं सांगायला हवी



होती का? पण कोणत्या शब्दात? तुम्ही सांगणार ना तिला?

## अठरा वर्षांची आशा

महेश हा आशाचा दूरचा नातलग आहे. तो गुंड प्रवृत्तीचा आहे, जुगारी आहे. महेशची वाईट नजर आशावर आहे. तो दररोज आशाच्या घरी येतो. आशाच्या आईकडे तो आशाला मागणी घालतो. म्हणतो, हिच्याशी लग्न करीन. आई ते ऐकून खूष होते. ती विचार करते, 'चला, डोक्यावरचं एक ओझं कमी झालं. मुलगी नात्यातच जाणार. मुलगा स्वतः मागणी घालतोय. हुंडा घेणार नाही.' पण आशाला महेश पसंत नाही. ती महेशला चांगली ओळखून आहे. पण लग्न उद्याच आहे. आता काय करता येणार? शंकर तर खूप लांब आहे. त्याच्यापर्यंत ही बातमी पोचवता येत नाही.

आशाला रडू कोसळतं. ती रडतच राहते. तिला हे लग्न करायचं नाही. पण तिला ते करावंच लागतंय. रडून रडून तिची अगदी वाईट अवस्था झाली आहे. तिला कोण शांत करेल? कसं? काय दिलासा देणार तिला? कोणाकडे आहेत तिला दिलासा देणारे शब्द? आशा रडते आहे. जाऊन तिला शांत करा. प्रेमाने, विश्वासाने आधार द्या.

## एकोणीस वर्षांची आशा

आशाचा नवरा दारूबाज आहे. रोज पितो. घरी झोकांड्या खात येतो. तिच्यावर आरडा-ओरड करतो. घाणेरड्या शिव्या देतो. तिला म्हणतो, तू वाईट चालीची आहेस. सांग तुझा यार कोण आहे ते. तू त्याला कुठं लपवून ठेवलंस? सांग! त्याचा खीमा करीन.

आज आशाला या कारणासाठी खूप मार खावा लागला. परंतु आशा मात्र हे गलिच्छ आरोपही सहन करीत राहते. काहीच बोलत नाही.

तिला सांगा की तिनं बोललं पाहिजे. किती दिवस गप्प बसणार ती? किती दिवस सहन करणार? कशासाठी? का सहन करावं तिनं? चुकीच्या गोष्टीबद्दल तिनं बोललं पाहिजे. नवऱ्याची तिनं अशी चंपी करायला हवी की त्याचं तोंडच बंद होईल. त्याची दारूची नशा खाड्कन उतरेल!

पण आपली आशा दुसरी आशा कशी बनेल? कशी स्वतःला बदलेल? कशी ती बोलायला शिकेल? सांगा तिला जरा. तुमच्यापाशी मदत मागायला आशा येणार नाही. पण तिला मदत तर हवी आहे. तुम्ही तिच्याजवळ जायला हवं. तिच्याशी बोलायला हवं. आपण तिला हिमतीनं राहायला शिकवलं पाहिजे. ते



आपलं कर्तव्य आहे. आपली ती जबाबदारी आहे.

## वीस वर्षांची आशा



आशाला आपल्या आईची फार आठवण येते आहे. तिचं मन पुन्हा पुन्हा आईकडं झेपावतं आहे. शरीर मात्र इथंच आहे. आशानं आईला भेटणं महेशला मुळीच पसंत नाही. आईला भीत भीत गुपचूप भेटते. कधीतरी. हे महेशला जेव्हा कळतं तेव्हा तो तिला बदडतो.

आशाला कळतं की आई अतिशय आजारी आहे. ती पटकन तयार होते. चप्पल घालून घरातून बाहेर पडते. इतक्यात तिचा नवरा, महेश येतो. तो आशाचं काही ऐकत नाही. तो आशाला जाऊ देत नाही. तिला जावसं खूप वाटतं, पण ती नवऱ्याला घाबरते. तिची आई मरणाच्या दारात उभी आहे. तिनं जाणं भाग आहे. तिनं जाणं जरूरी आहे. पण त्यासाठी हिम्मत हवी. तिच्यात हिम्मत नाही. तिला कोण हिम्मत देईल? कोणी नाही? आशा घरीच बसून राहील? तिच्या आईला अंथरूणात तडफडू दे? असंच मरू दे? तिला मदत करायला कोणी येणार नाही?

## एकवीस वर्षांची आशा

आशा गरोदर आहे. ती आई होणार आहे. हे मूल तिच्या सासूला नको आहे. तिला वाटतं हे मूल अशुभ महिन्यात जन्माला येईल. मुलाच्या जन्मामुळे घरात अशुभ होईल. परंतु आशाला मूल हवयं. गर्भ पाडण्याची तिची तयारी नाही. पण सासूचं ऐकलं नाही तर सासू जगू देणार नाही. आशा स्वतःच्या मनासारखं वागली तर तिला घरातून हाकलून देतील. काय करायचं तिनं? आपल्या सासूला कसं समजवायचं? सासू अंधश्रद्ध आहे. तिची अंधश्रद्धा कशी दूर करणार? आशा पेचात सापडली आहे. तिला काहीच सुचत नाही. तिला कोणाच्या तरी सल्ल्याची गरज आहे. तुम्हीच विचार करा आणि



आशाला या पेचातून सोडवा. तिला आई व्हायचं आहे. आई होण्याची खूप इच्छा आहे तिची.

## बावीस वर्षांची आशा

इकडं आशाची आई वारली. तिकडं दारूच्या नशेत असलेल्या नवऱ्याला बसने चिरडले. आता आशाची ना आई आहे, ना नवरा. तिचं कोणीच नाही. ती आता एकटी आहे. गावात तिला मदत करणारं कोणीच नाही. सगळेजण तिलाच दोष देतात. तिच्यामुळेच हे सगळं झालं, असं म्हणतात. तिला अवदसा ठरवतात.

तुम्ही या एकाकी दुःखीकष्टी बाईला मदत नाही करणार? कोणी तिच्याजवळ जाणार का? कोणी तिला मदतीचा हात देणार? कोणी म्हातारा? कोणी म्हातारी? कोणी पुरूष वा बाई? तिच्या दुःखात सहभागी होणार? कोणीच नाही ना?

आहे ना कोणीतरी? दिसतोय! त्या तिथे दूरवर!

## तेवीस वर्षांची आशा

महेशच्या कामातील लोकांनी आशाला नुकसानभरपाई मिळवून दिली आहे. थोडेसे पैसे आहेत. सासरा म्हणतो - ते पैसे मला दे. मी तुझा आणि तुझ्या मुलाचा सांभाळ

करीन. माझ्यावर भरवसा ठेव. परंतु आशाचा त्याच्यावर विश्वास नाही. तिला वाटतं, आपण कमवावं, स्वतःच्या पायावर उभं रहावं. पण तिला काही सुचत नाही. कधी वाटतं, पैसे सासऱ्याला द्यावेत, कधी वाटतं, देऊ नयेत. तुम्ही काय सुचवाल तिला? तिनं काय करावं? ती खूप कमी शिकलेली आहे. तिला छोटा मुलगापण आहे. अजून सगळं आयुष्य सरायचं आहे. या पैशांमुळे तिला खूप आधार मिळू शकतो.

## चोवीस वर्षांची आशा





शंकर गावी परत आला आहे. आशाला तो भेटलाय. आशाची कहाणी ऐकून तो खूप दुःखी झालाय. तो म्हणतो की मी आजही तुझ्याशी लग्न करायला तयार आहे. तयार आहेस तू? तू अशी किती दिवस विधवा, निराधार राहणार? मला तू आजही आवडतेस.

आशाला शंकरशी लग्न करायची इच्छा आहे. पण तिला भीती वाटते. आपल्या जातीचे लोक! काय म्हणतील? आणि गाव काय म्हणेल? नवऱ्याला मरून एक वर्षही झालं नाही तर दुसरं लग्न केलं. या बाईला काही लाज - बीज नाही. ती काहीच ठरवू शकत नाही. ती हवालदिल आहे. तिला काही ना काही निर्णय घ्यावा लागेल. ती तुमच्याकडे येते. तुम्हाला विचारते. तुम्हीच तिला सर्वात जवळचे आहात. तुम्ही योग्य सल्ला द्याल, असा तिला विश्वास आहे. मग तुम्ही काय सांगाल तिला? तिनं शंकरला काय उत्तर द्यावं? हो म्हणावं? की नाही?

## पंचवीस वर्षांची आशा

तुम्ही पाठिंबा दिलात. आशा आणि शंकरनं लग्न केलं. ते तुमचा आशिर्वाद मागायला आलेत.

त्यांना आशिर्वाद देणार ना?



तुम्हीच आशाला लग्न करण्याचा सल्ला दिला होता ना? आता आशिर्वाद पण द्या. तुमच्या आशीर्वादामुळं त्यांचं जीवन फुलेल. ते तुमच्या आशीर्वादाची वाट पाहताहेत. तुमच्या समोर उभे आहेत ते मोठ्या आशेने, उत्साहाने. तुम्हाला आपलं मानून. तुम्ही त्यांना आपलंसं करा.

